विजाभज आश्रमशाळांच्या तपासणीसाठी
वाहन व इंधनापोटी होणारा खर्च वेतनेत्तर
अनुदानामधून करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विभशा-२०१७/प्र.क्र. १३६ /विजाभज-२,**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २९ मे, २०१७.

संदर्भ :- शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.व्हीजेडब्ल्यु-१०९०/ प्र.क्र. २२/प्रस्ताव-२/मावक-६, दि. ८ ऑक्टोबर, १९९१.

**प्रस्तावना :**

राज्यात विजाभज प्रवर्गाच्या मुलांसाठी शिक्षणाच्या सुविधा उपलब्ध करुन देण्याचे शासनाचे धोरण आहे. त्यानुसार राज्यात स्वयंसेवी संस्थांमार्फत विजाभज विद्यार्थ्यांसाठी आश्रमशाळा अनुदान तत्वावर चालविल्या जात आहेत. त्यासाठी शासनामार्फत या स्वयंसेवी संस्थांना अनुदान दिले जाते.

२. शासनाच्या दि. १० नोव्हेंबर, २०१६ च्या परिपत्रकान्वये जिल्हाधिकारी यांचे नियंत्रणाखालील महिला अधिका-यांमार्फत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अधिनस्त सर्व शासकीय आणि अनुदानित वसतीगृहे व विजाभज आश्रमशाळांची तपासणी करण्याबाबत निर्देश दिलेले आहेत. उपरोक्त प्रमाणे तपासणीसाठी गाडया व इंधनाकरिता प्रति शाळा रु. १०००/- प्रमाणे एवढा खर्च प्रतिवर्षी अपेक्षित आहे.

३. विजाभज आश्रमशाळांसाठी वेतन व वेतनेत्तर खर्चासाठी संदर्भाधीन दि. ८ ऑक्टोंबर,१९९१ च्या शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सूचना देण्यात आलेल्या आहेत. विजाभज आश्रमशाळांना वेतनेत्तर अनुदान दिले जाते. त्यामध्ये परिपोषण अनुदान, निवासी व्यवस्था, शैक्षणिक साहित्य, गणवेश, क्रीडा साहित्य, इमारत भाडे इ. चा समावेश आहे. प्राथमिक शाळा विभागासाठी वेतनेत्तर अनुदान मंजूर करताना मान्यताप्राप्त शिक्षक कर्मचा-यांच्या एकूण वार्षिक वेतन रकमेच्या ८% व माध्यमिक शाळा विभागासाठी मान्यता प्राप्त कर्मचाऱ्यांच्या एकूण वार्षिक वेतन रक्कमेच्या १२% वेतनेतर अनुदान दिले जाते. त्याचप्रमाणे वसतिगृह विभागातील मान्यता प्राप्त कर्मचाऱ्यांच्या एकूण वार्षिक वेतन रक्कमेच्या ८% वेतनेत्तर अनुदान अनुज्ञेय आहे. त्यामध्ये आश्रमशाळा तपासणीसाठी वाहन व इंधनाची बाब मंजूर केलेली नाही. त्यामुळे वेतनत्तर बाबींमध्ये आश्रमशाळांच्या तपासणीसाठी वाहन व इंधनाची बाब समाविष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील विजाभज आश्रमशाळांची तपासणी जिल्हाधिकारी नियत्रंणाखालील महिला अधिकारी यांचे मार्फत करण्यासाठी वाहन व इंधनासाठी प्रति आश्रमशाळा प्रतिवर्ष रु. १०००/- (रु. एक हजार फक्त)

इतका निधी विजाभज आश्रमशाळा वेतनेत्तर अनुदानाकरिता लेखाशीर्ष (२२२५०७५३) (३१) सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) मधून त्या- त्या आर्थिक वर्षात खर्च करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २३९/२०१७/व्यय-१५दि.१.४.२०१७ नुसार प्राप्त झालेल्या मंजूरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०५२९१२०२५६६४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sumant D pashte

Digitally signed by Sumant D pashte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, cn=Sumant D pashte
Date: 2017.05.29 12:08:38 +05'30'

( सु.दि.पाष्टे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई.
३) सचिव, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण विभाग., मंत्रालय, मुंबई-३२
४) प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) आयुक्त,समाजकल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे,
६) आयुक्त,अपंग कल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे
७) संचालक,विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
८) जिल्हाधिकारी (सर्व)
९) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद (सर्व)
१०) प्रादेशिक उपायुक्त,समाजकल्याण विभाग (सर्व)
११) सहायक आयुक्त,समाजकल्याण (सर्व)
१२) जिल्हा समाजकल्याण अधिकारी,जिल्हा परिषद (सर्व)
१३) महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेय/लेखा परिक्षा) महाराष्ट्र ½,मुंबई/नागपूर,
१४) सह/उप/अवरसचिव/कक्ष अधिकारी,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई
१५) सह/उप/अवरसचिव/कक्ष अधिकारी,विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण विभाग,मंत्रालय,मुंबई
१६) निवड नस्ती (विजाभज-२).